मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी सव्वीसाव्या तिमाहीचा (Quarter-२६) हप्त्याचा निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सीसीटी-३११६/प्र. क्र. ७७/भाग-७/पोल-३**

गृह विभाग, २ रा मजला,

मंत्रालय, मुंबई-**४०० ०३२**

दिनांक: २९ /३/२०२४

<u>वाचा</u> -

१) गृह विभाग, शासन निर्णय क्र. आयएसएस १००९/प्र.क्र.३१३/विशा-४, दि.२७.०७.२०११.

२) गृह विभाग, शासन निर्णय क्र.आयएसएस-१००९/प्र.क्र.३१३ (भाग-२)/विशा-४, दि.६.०१.२०१२.

३) महाराष्ट्र शासन आणि मे. लार्सन अँड टुब्रो कंपनी यांचे दरम्यान दि.७.२.२०१५ रोजी झालेला करार.

४) शासनाचे क्र.सीसीटी ३११५/प्र.क्र.२१/पोल-३,दि.७.२.२०१५ चे कार्यादेश.

५) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५

६) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८.४.२०१७

७) गृह विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१५/प्र. क्र. ६४/विशा -३(अ), दि.०४.०८.२०१७.

८) गृह विभाग, शासन पत्र क्र.३११५/प्र.क्र.२१/भाग-२/पोल-३, दिनांक ०८.११.२०१७.

९) गृह विभाग, शासन निर्णय क्र.सीसीटी-३११५/प्र.क्र.२१/भाग-२/पोल-३, दि.०५.११.२०१८.

१०) गृह विभाग, शासन निर्णय क्र.सीसीटी-३११५/प्र.क्र.२१/भाग-२/पोल-३, दि.२६/२/२०१९

११) अ.मु.स. (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली दि.२२/९/२०२२ रोजी झालेल्या उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीचे इतिवृत्त दि.२०/१०/२०२२ चे पत्र

१२) गृह विभाग पत्र क्र.No.MIS ३६१९/C.R.६६/Pol ३, दि.१९/१०/२०२२

१३) अ.मु.स. (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली दि.१४/३/२०२३ रोजी झालेल्या उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीचे इतिवृत्त दि.२७/३/२०२३ चे पत्र

१४) गृह विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-१०२२/प्र.क्र.११९/पोल-३, दि.२९/३/२०२३

१५) अ.मु.स. (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली दि.१६/१/२०२४ रोजी झालेल्या उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीचे इतिवृत्त दि.७/२/२०२४ चे पत्र

१६) प्रकल्प संचालक, मे.लार्सन अँड टुब्रो कंपनीचे दिनांक दि.१५/३/२०२४ रोजीची पत्रे व त्यासोबत सादर केलेले सव्विसाव्या तिमाहीची देयके.

१७) प्रकल्प सल्लागार मे.पीडब्ल्युसी कंपनीने दि.२०/३/२०२४ रोजीच्या ई मेल संदेशाद्वारे सादर केलेला अहवाल.

१८) पोलीस उपायुक्त (अभियान) मुंबई शहर यांचे दिनांक २८/३/२०२४ रोजीचे पत्र.

१९) शासनपत्र क्र.संकीर्ण-१०२२/प्र.क्र.११९/पोल-३, दि.२२/२/२०२४

**प्रस्तावना-**

मुंबई शहरात सुरक्षेच्या दृष्टीने सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्यासाठी मे. लार्सन अॅन्ड टुब्रो कंपनी लि. या कंपनीसोबत दि.०७.०२.२०१५ रोजी शासनाने करार केला आहे. सदर करारानुसार मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाची एकूण किंमत रु.९४९ कोटी एवढी ठरविण्यात आली आहे. सदर प्रकल्पासाठी गृह विभाग, शासन निर्णय दि.०६.०१.२०१४ अन्वये एकूण रु.६०० कोटी एवढया रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तद्नंतर गृह विभाग शासन निर्णय दि.०२.३.२०१६ अन्वये रु. ३४९ कोटी एवढया रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. तद्नंतर गृह विभाग शासन निर्णय दि. ०५.११.२०१८ अन्वये रु.९८०,३३,८०,०२४/-(अक्षरी रुपये नऊशे ऐंशी कोटी तेहतीस लाख ऐंशी हजार चोवीस) एवढया रकमेस सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. तदनंतर गृह विभाग शासन निर्णय दि. २६.०२.२०१९ अन्वये रु.१३०३.५६ कोटी(अक्षरी रुपये एक हजार तीनशे तीन कोटी छप्पन लाख ) एवढ्या रकमेस सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे.

मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाचे काम शहराच्या क्षेत्रानुसार तीन टप्प्यात करण्यात येणार होते. परंतु काही तांत्रिक व प्रशासकीय अडचणीमुळे दि.१०.०५.२०१६ रोजीच्या उच्चस्तरीय शक्तीप्रदान समितीच्या बैठकीमध्ये शहरात बसविण्यात आलेल्या कॅमेऱ्यांच्या संख्येनुसार कामाचे टप्पे निश्चित करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार पहिल्या टप्प्यामध्ये (phase-I) मध्ये ९३७ कॅमेरे कार्यान्वित (Go-Live) करणे, दुस-या टप्प्यामध्ये १८८० कॅमेरे कार्यान्वित करणे व तिस-या टप्प्यामध्ये १८८० कॅमेरे कार्यान्वित करण्याचा निर्णय झाला. त्यानुसार शासनाने मुंबई सीसीटीव्ही प्रकल्पाचा पहिला टप्पा दि. ४.६.२०१६ पासून कार्यान्वित (Go-Live) झाला असे दिनांक २०.६.२०१६ च्या पत्रान्वये घोषित केले आहे. त्यानंतर मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाचा दुसरा टप्पा दि.१९.९.२०१६ पासून कार्यान्वित (Go-Live) झाला असे दिनांक १९.९.२०१६ च्या पत्रान्वये घोषित करण्यात आले आहे. उच्चस्तरीय शक्तीप्रदान समितीच्या बैठकीमधील निर्णयाच्या अनुषंगाने मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाच्या तिसऱ्या टप्प्यासह प्रकल्प दि.०५.०९.२०१७ पासून कार्यान्वित (Go-Live) झाला असे दिनांक ०८.११.२०१७ च्या पत्रान्वये घोषित करण्यात आले आहे.

मुंबई सीसीटीव्ही टप्पा १ या प्रकल्पाचा कार्यान्वयन देखभाल दुरुस्ती कालावधी (operation & Maintenance) दि.४/९/२०२२ रोजी पूर्ण झाला आहे. उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या संदर्भाधीन क्र.११ दि.२२/९/२०२२ रोजीच्या बैठकीत, मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाच्या कार्यान्वयन देखभाल दुरुस्तीसाठी (operation & Maintenance) मे.एल अँड टी कंपनी यांना एका वर्षासाठी दि.४ सप्टेंबर, २०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यास मंजूरी देण्यात आली आहे. तसेच संदर्भ क्र.१३ दि.१४/३/२०२३ रोजीच्या उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीची बैठकीमध्ये मे.एल अँड टी कंपनी यांना मुंबई सीसीटीव्ही प्रकल्पाचा कार्यान्वयन देखभाल दुरुस्तीच्या (operation & Maintenance) ६ व्या वर्षासाठी दि.५/९/२०२२ ते दि.४/९/२०२३ या कालावधीकरिता रु.९०,३५,५८,९९३/- (जीएसटी वगळून) इतक्या खर्चास मान्यता देण्यात आली आहे. याबाबतचा शासन निर्णय संदर्भाधीन क्र.१४,दि.२९/३/२०२३ रोजी निर्गमित करण्यात आला आहे.

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली दि.१४/१२/२०२३ रोजी प्रकल्प अंमलबजावणी समितीची (PIC) बैठक झाली. सदर बैठकीमध्ये झालेल्या निर्णयानुसार, अपर मुख्य सचिव (गृह) यांचे अध्यक्षतेखाली दि.१६/१/२०२४ रोजी उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीची बैठक आयोजित करण्यात आली. सदर बैठकीमध्ये पुढीलप्रमाणे निर्णय झाला आहे :-

The committee discussed and deliberated on the analysis presented by the PMC and issued the following directives

The committee approved L & Ts extension for one year (i.e. from 05the September 2023 to 04th September 2024) as per the current rates with no cost escalation.

SLA and Terms and Conditions will be the same as per the signed contract dated 07 the February 2015

L &T to ensure all Phase I and Phase II cameras are viewed and recorded as per technical compliance.

L& T is to maintain all the hardware till 04 th September 2024 and should ensure that the Operation and Maintenance should function smoothly.

मे.एल अँड टी कंपनी यांना मुंबई सीसीटीव्ही प्रकल्पाचा कार्यान्वयन देखभाल दुरुस्तीच्या (operation & Maintenance) ७ व्या वर्षासाठी दि.५/९/२०२३ ते दि.४/९/२०२४ या कालावधीकरिता वरीलप्रमाणे मान्यता देण्यात आली आहे. त्याअनुषंगाने दि.२२/२/२०२४ रोजीच्या शासन पत्रान्वये मे. लार्सन अँड टुब्रो कंपनीला कळविण्यात आले आहे.

त्यानुसार प्रकल्प संचालक मे. लार्सन अँड टुब्रो कंपनीस कार्यान्वयन देखभाल दुरुस्तीचा (operation & Maintenance) (OPEX) खर्च हा तिमाही हप्त्यामध्ये अदा करणे आवश्यक आहे. त्यानुसार मे.लार्सन ॲन्ड टुब्रो कंपनीने संदर्भाधीन क्र.१६ येथील दि.१५/३/२०२४ रोजीच्या पत्रान्वये अनुक्रमे मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाच्या सव्विसाव्या तिमाहीची ( Quarter-२६ ) देयके सादर केली असून ती अदा करण्याची विंनती केली आहे. त्यानुषंगाने प्रकल्प सल्लागार मे.पीडब्ल्युसी कंपनीने उपरोक्त संदर्भाधीन क्र.१७ येथील दि.२०/३/२०२४ रोजी सादर केलेल्या अहवालानुसार मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाच्या सव्विसाव्या तिमाहीसाठी जीएसटीसह (Quarter-२६) Opex करिता रु.२३,९९,६९,४२१/- (अक्षरी रुपये तेवीस कोटी नव्व्याण्णव लाख एकोणसत्तर हजार चारशे एकवीस फक्त) एवढा निधी देय होत आहे. संदर्भाधीन क्र.१८ येथील पोलीस उपायुक्त (अभियान), मुंबई शहर यांनी दि.२८/३/२०२४ रोजीच्या पत्रान्वये सव्विसाव्या तिमाहीसाठीचे User Certificate सादर केले आहे. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

मे. लार्सन अँड टुब्रो कंपनी लि. व शासन यांच्यामध्ये दि.०७.०२.२०१५ रोजी मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पासंदर्भात करार झालेला आहे. मुंबई सीसीटीव्ही टप्पा १ या प्रकल्पाचा कार्यान्वयन देखभाल दुरुस्ती कालावधी (operation & Maintenance) दि.४/९/२०२२ रोजी पूर्ण झाला आहे. उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या संदर्भाधीन क्र.११ दि.२२/९/२०२२ रोजीच्या बैठकीत, मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाच्या कार्यान्वयन देखभाल दुरुस्तीसाठी (operation & Maintenance) मे.एल अँड टी कंपनी यांना एका वर्षासाठी दि.४ सप्टेंबर, २०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यास मंजूरी देण्यात आली आहे. तसेच संदर्भ क्र.१३ दि.१४/३/२०२३ रोजीच्या उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीची बैठकीमध्ये मे.एल अँड टी कंपनी यांना मुंबई सीसीटीव्ही प्रकल्पाचा कार्यान्वयन देखभाल दुरुस्तीच्या (operation & Maintenance) ६ व्या वर्षासाठी दि.५/९/२०२२ ते दि.४/९/२०२३ या कालावधीकरिता रु.९०,३५,५८,९९३/- (जीएसटी वगळून) इतक्या खर्चास मान्यता देण्यात आली आहे. याबाबतचा शासन निर्णय संदर्भाधीन क्र.१४ दि.२९/३/२०२३ रोजी निर्गमित करण्यात आला आहे. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे अध्यक्षतेखाली दि.१६/१/२०२४ रोजी उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीची बैठक आयोजित करण्यात आली. सदर बैठकीमध्ये The committee discussed and deliberated on the analysis presented by the PMC and issued the following directives

The committee approved L & Ts extension for one year (i.e. from 05th September 2023 to 04th September 2024) as per the current rates with no cost escalation.

SLA and Terms and Conditions will be the same as per the signed contract dated 07 the February 2015

L &T to ensure all Phase I and Phase II cameras are viewed and recorded as per technical compliance.

L& T is to maintain all the hardware till 04 th September 2024 and should ensure that the Operation and Maintenance should function smoothly. असा निर्णय झाला. त्यानुसार मे.एल अँड टी कंपनी यांना मुंबई सीसीटीव्ही प्रकल्पाचा कार्यान्वयन देखभाल दुरुस्तीच्या (operation & Maintenance) ७ व्या वर्षासाठी दि.५/९/२०२३ ते दि.४/९/२०२४ या कालावधीकरिता वरीलप्रमाणे मान्यता देण्यात आली आहे. त्याअनुषंगाने दि.२२/२/२०२४ रोजीच्या शासन पत्रान्वये मे. लार्सन अँड टुब्रो कंपनीला कळविण्यात आले आहे.

प्रकल्प संचालक मे. लार्सन अँड टुब्रो कंपनीस कार्यान्वयन देखभाल दुरुस्तीचा (operation & Maintenance) (OPEX) खर्च हा तिमाही हप्त्यामध्ये अदा करणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने मुंबई शहर

सीसीटीव्ही प्रकल्पाच्या सव्विसाव्या तिमाहीसाठी जीएसटीसह (Quarter-२६) Opex करिता रु.२३,९९,६९,४२१/- (अक्षरी रुपये तेवीस कोटी नव्व्याणव लाख एकोणसत्तर हजार चारशे एकवीस फक्त) जीएसटीसह एवढी रक्कम प्रकल्प संचालक, मे.लार्सन अँड टुब्रो कंपनीस वितरित करण्यास या आदेशान्वये मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदर रक्कमेची देयके कंपनीला अदा करतांना आयकर व इतर प्रचलित कर वजाती करुन अदा करण्यात यावी.सदर रकमेत जीएसटी कराचा समावेश आहे.

३. प्रस्तुत प्रकरणी उपरोक्त प्रमाणे होणारा खर्च हा "मागणी क्र.बी-१०, ४०५५ - पोलीस यावरील भांडवली खर्च, ८०० इतर खर्च, (००) (०९) सीसीटीव्ही यंत्रणा बसविणे (४०५५ ०२२३) या अंतर्गत ५२-यंत्रसामग्री साधनसामग्री" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२३-२४ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदरहु रक्कम आहरीत करण्यासाठी पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांना नियंत्रण अधिकारी व त्यांच्या अधिनस्त आहरण व संवितरण अधिका-याला आहरण व संवितरण अधिकारी म्हणुन घोषीत करण्यात येत आहे. त्यांनी उपरोक्त निधी प्रकल्प संचालक Larsen & Toubro Ltd.-SW&C BU या कंपनीच्या १६३, अन्नासलाई, चेन्नई-६०० ००२ येथील सीटी बँकेच्या शाखेचे खाते क्र.०५२१४६६३०८ (IFSC Code - CITI०००००३) (MICR CODE OF THE BANK-६०००३७००२) या खात्यावर जमा करण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.४.२०१५ मधील वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उपविभाग-दोन, महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार व अनु.क्र. २७ अ, नियम क्र.७६ अन्वये प्रशासकीय विभागाला असलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२९१५३०५७६८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KAILAS ARJUN GAIKWAD

Digitally signed by KAILAS ARJUN GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=47D160717AE29C2D2661B5275D8B9B4CFAE93893BE65A27853145A4C04D865CD, cn=KAILAS ARJUN GAIKWAD
Date: 2024.03.29 15:40:55 +05'30'

**( कैलास गायकवाड )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव.
३. मा.उपमुख्यमंत्री, (गृह) यांचे खाजगी सचिव.
४. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
५. प्रधान सचिव (विशेष) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
६. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
८. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
९. महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

१२. मे. लार्सन अँड टुब्रो कं. लि, एल अँड टी हाऊस, एन. एम. मार्ग, बलार्ड इस्टेट, मुंबई-१.

१३. मे.प्राईसवॉटर हाऊस कुपर्स लि., २५२, वीर सावरकर मार्ग, दादर (प), मुंबई-४०० ०२८.

१४. वित्त विभाग, व्यय-७/वित्तीय सुधारणा.

१५. अर्थसं-१/गृह विभाग, मुंबई.

१६. रोख शाखा/ गृह विभाग, मुंबई.

१७. निवडनस्ती, पोल-३.